किकवी पेयजल प्रकल्पास ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक :- किकवी /२००९/(२७३/०९)/जसंअ,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- २६/०८/२००९,

संदर्भ :- १) मुख्य अभियंता,उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे पत्र उमप्र/तां.१/१६६८/२००९,दि.११.५.२००९
२) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांचे ज्ञापन दिनांक १०.६.२००९
३) मा.राज्यपालांचे सचिव यांचे अर्धशासकीय पत्र दिनांक १४ ऑगस्ट २००९ चे पत्र

**प्रस्तावना** :

नाशिक शहराच्या पिण्याच्या तथा औद्योगिक वापरासाठी गंगापूर धरणातून पाणी पुरवठा करण्यात येत आहे. गंगापूर धरणात मोठया प्रमाणात गाळ साठल्यामुळे धरणाची साठवण क्षमता कमी झाली आहे. नाशिक शहराची वाढती लोकसंख्या व औद्योगिक प्रगती लक्षात घेता, भविष्यकाळात नाशिक परिसरातील धरणांमधून बिगर सिंचनासाठी पाण्याची गरज सतत वाढत आहे. यामुळे नाशिक परिसरातील सिंचन प्रकल्पांच्या पाणी साठयाच्या २५ टक्केपेक्षा जास्त बिगर सिंचन आरक्षण होत आहे. त्यामुळे गंगापूर धरणाची कमी झालेली सिंचन क्षमता काही प्रमाणात पुनर्स्थापित करण्याच्या दृष्टीने व नाशिक शहराची भविष्यकालीन बिगर सिंचनाची पाण्याची गरज भागविण्याच्या दृष्टीने गंगापूर धरणाच्या वरील बाजूस किकवी नदीवर धरण बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

सदरची किकवी धरण नाशिक महानगरपालिकेने जवाहरलाल नेहरु नागरी पुनर्निमाण अभियानांतर्गत केंद्र शासनाकडून उपलब्ध होणाऱ्या निधीतून बांधण्याच्या शक्यतेची पडताळणी करण्यात आली. परंतु जवाहरलाल नेहरु नागरी पुनर्निमाण अभियानांतर्गत महाराष्ट्र राज्यासाठी विहित केलेली केंद्रिय अर्थसहाय्याची मर्यादा संपत आल्यामुळे सद्य:स्थितीत किकवी प्रकल्पाचा प्रस्ताव विचारात घेणे नाशिक महानगरपालिकेस शक्य होत नाही.

दि.२२.७.२००९ रोजी नाशिक येथे झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत ही वस्तुस्थिती विचारात घेण्यात आली आणि जलसंपदा विभागाने किकवी धरणाचा प्रकल्प अहवाल तयार करुन आवश्यक कार्यवाहीसाठी नगर विकास विभागाकडे पाठवावा असे ठरले. त्या अनुषंगाने प्रस्ताव नगर विकास विभागाकडे संदर्भित केला

असता, त्या विभागाने कळविले की जलसंपदा विभागाने स्वतःच्या निधीतून किकवी धरणाचे बांधकाम हाती घेऊन सदर धरणाचे पाणी नाशिक महानगरपालिकेला उपलब्ध करुन दिल्यास नाशिक महानगरपालिका ठरविलेल्या दराने पाणी आकार देईल.

वस्तुतः किकवी प्रकल्प नाशिक महानगरपालिकेच्या बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी प्रस्तावित असल्याने महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीका परिच्छेद क्र.१३२ मधील तरतुद विचारात घेता, या प्रकल्पास नाशिक महानगरपालिकेने प्रशासकीय मान्यता प्रदान करुन महानगरपालिकेकडील उपलब्ध निधीतून विकसित करणे अभिप्रेत आहे.

तथापि असे करण्यास नाशिक महानगरपालिकेने दर्शविलेली असमर्थता लक्षात घेऊन मा.राज्यपाल महोदय यांना हा प्रकल्प नवीन योजना म्हणून सन २००९-१० मध्ये जलसंपदा विभागामार्फत हाती घेण्यास अनुमती देण्याची विनंती करण्यात आली. ही विनंती मा.राज्यपाल यांनी दि.१४.८.२००९ रोजी मान्य केली.

**शासन निर्णय** :-

किकवी प्रकल्प ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक या पेयजलासाठी असलेल्या प्रकल्पाच्या रु.२८३.५४ कोटी (रुपये दोनशे त्र्याऐंशी कोटी चौपन्न लक्ष फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता सोबतच्या तांत्रिक टिप्पणीतील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे. (तांत्रिक टिप्पणी व अंदाजपत्रकांचा गोषवारा सोबत जोडला आहे.)

या प्रकल्पावर होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२ योजनांतर्गत ) (०२) (०५) महाराष्ट गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ४७०१ एच (९९)"या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा व ह्या कामासाठी आर्थिक तरतुद असल्याखेरीज कोणताही खर्च करु नये.

हा शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नगर विकास विभाग, नियोजन विभाग, वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे WWW.maharashtra. gov.in या वेब साईटवर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २००९०८२६२३४००९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

सहपत्रः-१) तांत्रिक टिप्पणी
२)अंदाजपत्रकाचा गोषवारा

( अ.कि.सुरुशे )
शासनाचे उप सचिव

प्रतः-

मा.राज्यपालांचे सचिव
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई,
प्रधान सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
पर्यावरण विभाग (र-५), मंत्रालय, मुंबई,
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
उपसंचालक, प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन व उपसचिव महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर ,
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
महासंचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक,
आयुक्त, महानगरपालिका, नाशिक,
कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
मुख्य अभियंता (पा.) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
मुख्य अभियंता (कृ.पा.त.ल.) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक,
जिल्हाधिकारी, नाशिक,
उप सचिव (मोप्र-१) मंत्रालय, मुंबई,
उप सचिव (सिंव्य) मंत्रालय, मुंबई,
जसंअ, कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक किकवी-२००९/(२७३/०९)/जसंअ,**
**दिनांक २६/०८/२००९, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ चे सहपत्र (१)**

## तांत्रिक टिप्पणी

### किकवी पेयजल प्रकल्प, ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक

१) या योजनेस महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांनी दि.१०.६.२००९ च्या ज्ञापनाद्वारे मान्यता देताना घातलेल्या अटींची पूर्तता करावी.

२) या प्रस्तावास तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी प्रादेशिक मुख्य अभियंतानी धरणाची संकल्पने, परिमाणे, वहनअंतरे, प्रचलित दर यांची सखोल तपासणी करुन पुढील कार्यवाही करावी.

३) वन जमीन संपादनाकरीता प्रथम केंद्रिय वन व पर्यावरण मंत्रालयाची मान्यता घेण्यात यावी.

४) प्रकल्प पेयजलाकरिता असल्यामुळे दरम्यानच्या काळात जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय पुनर्निर्माण अभियाना अंतर्गत किंवा नाशिक महानगरपालिका यांनी स्वतःच्या अनुदानातून या प्रकल्पास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत प्रयत्न करावेत किंवा राज्य शासनाच्या उच्चाधिकार समितीमध्ये ठरल्याप्रमाणे पिण्यासाठी नाशिक महानगर पालिकेला पाणी उपलब्ध करुन देताना नाशिक महानगरपालिका यांचेकडून शासनाने ठरविलेल्या दराने पाणी आकार आगाऊ देईल या विषयी महानगरपालिकेकडून त्यांच्या सर्व साधारण सभेचा ठराव काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घ्यावा.

५) कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी शासनाची परवानगी घेऊन कामास प्रारंभ करावा.

६) निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करुनये.

( अ.कि.सुरुशे )
शासनाचे उप सचिव

## KIKVI PROJECT, TAL-TRIMBAKESHWAR, DIST. NASHIK

## RECAPITULATION SHEET

| Sub Heads | Amount. Rs.in Crore |
|---|---|
| 'A' Preliminary | 2.42 |
| 'B' Lands | 121.40 |
| 'C' Works :<br>i) Earthen Dam | <br>89.50 |
| ii) Spillway | 25.77 |
| 'D' Regulator ( W.S.C.P.O.) | 26.05 |
| Total of Work Portion = Rs.1413172070 | |
| 'K' Building | 0.50 |
| 'M' Plantation | 0.10 |
| 'O' Miscellanceous | 0.35 |
| 'P' Maintenance | 0.35 |
| 'Q' Special T & P | 2.00 |
| 'R' Communication | 0.36 |
| **Total Rs.** | **268.80** |
| Add 10% Centage charges on cost excluding Land Acquisition Rs.121.40 | 14.74 |
| **Gross cost of the Scheme :-** | **283.54** |

( अ.कि.सुरुशे )
शासनाचे उप सचिव